विभागीय क्रीडा संकुल नागपूर यासाठी नुतनीकरण व दुरूस्तीकरिता विशेष बाब निधी वितरण मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्रशासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः विक्रीसं-१११६/प्र.क्र.२२४/क्रीयुसे-१,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :३१ मार्च, २०१७.

**वाचा:-**

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व क्रीडा विभाग क्रमांक : राक्रीधो-२००३/(प्र.क्र.११/०३)/ क्रीयुसे-१, दिनांक २६ मार्च,२००३.
२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : राक्रीधो-२००९/(प्र.क्र.२५/०९)/ क्रीयुसे-१, दिनांक २१ मार्च,२००९.
३. सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक:जिक्रीसं/चंद्रपूर/२००४/ (१११)/का-९/८९३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१७.
४. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : पुनर्वि-२८१६/(७०/१६)/अर्थसंकल्प, दिनांक ३१ मार्च, २०१७.

**प्रस्तावना :-**

जिल्हा क्रीडा संकुल देखभाल दुरूस्ती या योजनेमधून विभाग व जिल्हा क्रीडा संकुलाकरिता प्रथम तीन वर्षाकरिता वार्षिक अनुदान वितरीत केले जाते. या योजनेंतर्गत विभागीय क्रीडा संकुल, नागपूर करिता विशेष बाब म्हणून रु.२.२५ कोटीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सन २०१६-१७ या वर्षाकरिता विभागीय क्रीडा संकुल, नागपूर यांच्या नुतनीकरण व दुरूस्तीकरिता शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : पुनर्वि-२८१६/ (७०/१६)/ अर्थसंकल्प, दिनांक ३१ मार्च, २०१७ अन्वये पुनर्विनियोजनाद्वारे प्राप्त झालेला रु.२.२५ कोटी एवढा निधी खालील बाबींकरिता वितरीत करण्यास व आयुक्त,क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

I. वसतीगृह इमारत व प्रसाधनगृह दुरुस्ती.
II. स्टेडियम व वसतीगृहामधील अग्नीशामक व्यवस्था.
III. इनडोअर स्टेडियम मधील ५०० टन वातानुकुलित यंत्रणा (A.C.Plant)
IV. विद्युत ट्रान्सफार्मरची दुरुस्ती व देखभाल.
V. ५०० टन वातानुकुलित यंत्रणाची (A.C.Plant) सर्व समावेश वार्षिक देखभाल करार.

२. सन २०१६-१७ मध्ये देखभाल दुरुस्तीकरीता पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध झालेल्या रु.२.२५ कोटी एवढया तरतुदी मधून विभागीय क्रीडा संकुल, नागपूरच्या वरील बाबींकरिता सदर निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त देखभाल दुरुस्तीचा निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याचवेळी आहरीत करावी. शासन लेख्या बाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्तविषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/ नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन उपरोक्त वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०३) जिल्हा क्रीडा संकुलांचे परिरक्षण (२२०४ ५३१२), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभाग दिनांक २०.०४.२०१६ व दिनांक २४.०७.२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, नागपूर विभाग, नागपूर यांना आहंरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९५/व्यय-५, दिनांक ३०.०३.२०१७ च्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३१२२४७४६४०२१असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.03.31 22:50:35 +05'30'

**( कि. ल. संखे )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे.

३. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१-मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.

४.महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१-मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
५. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, नागपूर विभाग, नागपूर.
६. जिल्हा क्रीडा अधिकारी, नागपूर (क्रीडा संचालनालयामार्फत),
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर. (क्रीडा संचालनालयामार्फत),
७. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवड नस्ती (क्रीयुसे-१)